**प्रशासकीय मान्यता**

सर ज.जी.समूह रुग्णालय, मुंबई अंतर्गत अतिविशेषोपचार रुग्णालयासाठी बहुमजली इमारत बांधणेसाठी सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : जेजेएच-२०११/प्र.क्र.६६२/प्रशा-१**
गो.ते.रुग्णालय आवार,नविन मंत्रालय, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०५ फेब्रुवारी, २०१९

**वाचा :**
१) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्रमांक : जेजेएच-२०११/प्र.क्र.६६२/प्रशा-१, दिनांक : २३.०१.२०१२
२) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे क्रमांक : संवैशिवसं/जजीरुमु/अ.वि.रु.बहु.इमारत/८८६.८०कोटी/१०११३/प-आय/२०१७, ६२९३, दि ०३.०५.२०१७.
३) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे क्रमांक : संवैशिवसं/जजीरु मुंबई/डीसी/अतिविशेषोपचार रु./७९२/प(आय)/८५४/१८, दि. २२.०१.२०१८

**प्रस्तावना** :

संदर्भाधीन क्रमांक ०१ च्या शासन निर्णयान्वये विभागाच्या अधिपत्याखालील सर ज.जी.समूह रुग्णालय, भायखळा, मुंबई येथील एकूण ४२ एकर भुखंडाच्या आवारात अस्तित्वातील जुन्या व जीर्ण झालेल्या इमारती पाडून तेथे अतिविशेषोपचार रुग्णालयाची बहुमजली इमारत, वसतीगृह व अधिकारी/ कर्मचारी निवासस्थाने इत्यादी बांधकामासाठी मंत्रिमंडळाच्या मान्यतेने रुपये ४७९,९५,१६,७२४/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास त्याचप्रमाणे या रुग्णालयासाठी लागणाऱ्या अंदाजे रुपये १५० कोटी इतक्या रकमेच्या अत्याधुनिक यंत्रसामुग्री व ही यंत्रसामुग्री हाताळण्यासाठी लागणाऱ्या कर्मचारी वर्गावर होणाऱ्या अंदाजे प्रतिवर्ष रुपये १९ कोटी इतक्या वाढीव आवर्ती खर्चासही प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर बांधकामासाठी आवश्यक विविध परवानग्या, ना-हरकत प्रमाणपत्रे, अंदाजपत्रक सन-२०११-१२ च्या दरसुचीवर आधारीत असल्यामुळे या कालावधीत झालेली भाववाढ, रुग्णालय इमारतीच्या संकल्पनात व इमारतींच्या उंचीमध्ये झालेला बदल, इत्यादी कारणांमुळे प्रकल्पाच्या किंमतीमध्ये वाढ झाली त्यामुळे सदरहू

इमारतीचे बांधकाम करण्यात आले नाही. याबाबत सदर कामाच्या सुधारित अंदाजपत्रकीय प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

विभागाच्या अधिपत्याखालील सर ज.जी.समूह रुग्णालय,मुंबई अंतर्गत अतिविशेषोपचार रुग्णालयासाठी बहुमजली इमारत बांधणेसाठी खालील तक्त्यात दर्शविलेल्या प्रमाणे बांधकाम करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच सचिव समितीने दिनांक १५.१२.२०१८ रोजीच्या बैठकीमध्ये घेतलेल्या निर्णयानुसार एकूण रुपये ७७८६५.२० लक्ष (अक्षरी रुपये सातशे अठ्याहत्तर कोटी पासष्ट लक्ष वीस हजार फक्त ) इतक्या खर्चाच्या सुधारित अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | कामाचे स्वरुप | संचालनालयाने प्रस्तावित केलेली रक्कम रुपये | सार्वजनिक बांधकाम विभाग व सचिव समितीने मान्यता दिलेली रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | Construction of Multi-Storey Super Specialty Hospital Building at Sir J. J. Group of Hospital Campus, Byculla, Mumbai<br>सर ज.जी.समूह रुग्णालय, मुंबई अंतर्गत अतिविशेषोपचार रुग्णालयासाठी बहुमजली इमारत बांधणेसाठी | 659,14,88,518 | 778,65,20,000 |
| | **एकूण** | 659,14,88,518 | 778,65,20,000 |

**अटी व शर्ती :-**

१. काम सुरु करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.
२. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.
३. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.: इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागाने सादर केल्यानुसार मास्टर प्लॅन प्रमाणे हाती घेण्यात यावे.

५. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काची पूर्तता करुन घ्यावी.

६. कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अभियंता/अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

७. कामासाठी जागेची उपलब्धता, जागा पुरेशी आहे किंवा नाही, याबाबतची खात्री संबंधीत संस्था प्रमुखांनी करावी.

८. प्रत्यक्षात काम सुरू करण्यापूर्वी विविध स्थानिक संस्थांकडून आवश्यक त्या परवानग्या प्राप्त करूनच काम हाती घेण्यात यावे.

९. संबंधीत संस्थेच्या अधिष्ठातांनी या विभागाचे शासन परिपत्रक दिनांक ०७.०२.२०१३ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांचे पालन करावे.

**२.** सदर काम खाली नमूद केलेल्या लेखाशीषाअंतर्गत मंजूर तरतूदीतून करण्यात येईल.

मागणी क्रमांक - एच-०८

४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च

०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन,

१०५-विषमचिकित्सा

(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

**३**. याविषयी मा.मुख्य सचिव समितीच्या दिनांक १५.१२.२०१८ च्या बैठकीच्या अनुषंगाने निर्गमित इतिवृत्तातील निर्देशानुसार सदर कामांसाठी नविन लेखाशीर्ष निर्माण करण्यास संबंधीतांची सहमती प्राप्त झाल्यानंतर सदरहू कामासाठी नविन लेखाशीर्षाअंतर्गत निधी उपलब्ध करुन देण्याबाबत कार्यवाही करण्यात येईल.

**४.** हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका-१९७८ भाग-१, उप विभाग-५ अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३) यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७३/इमा-३, दिनांक ०६.०२.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीच्या

अनुषंगाने तसेच सचिव समिती दिनांक १५.१२.२०१८ रोजीच्या बैठकीमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमित इतिवृत्तातील निर्देशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच संकेतांक २०१९०२०४१७३३०००४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Babanrao Surwase

Digitally signed by Prakash Babanrao Surwase
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eb1adbd5d5d31cf6d91c86149c955a6822b4fea3e4ec334c18e2c6f96cc5301b, cn=Prakash Babanrao Surwase
Date: 2019.02.05 12:46:03 +05'30'

(प्रकाश सुरवसे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२) महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, मा.मुख्यमंत्री महोदयांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.
९) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१०) अधिष्ठाता, ग्रॅन्ट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर ज.जी.समूह रुग्णालय,भायखळा, मुंबई.
११) कार्यासन अधिकारी,सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई (इमारत-३) मंत्रालय, मुंबई.
१२) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.
१३) कार्यकारी अभियंता, एकात्मिक घटक (सार्वजनिक बांधकाम) विभाग, मुंबई.
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१६) निवडनस्ती (प्रशा-१).